**महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाकडून (MSSIDC) “मैत्री” कक्षासाठी भाडेतत्त्वावर घेतलेल्या जागेच्या भाडयापोटी देय रक्कम अदा करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय, क्र.मेइम-२०१७/प्र.क्र. ५७ /उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२७ सप्टेंबर, २०१८

वाचा:- १) शासन निर्णय क्र.इ बीज-२०१३/ प्र.क्र.११७/ उद्योग-८ दिनांक १/३/२०१४
२) शासन निर्णय क्र. मेइम-२०१५/ प्र.क्र.१०५ / उद्योग-८ दिनांक ११/२/२०१६
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९ /अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
४) शासन परिपत्रक,उ.ऊ.व का.विभाग, क्र.अर्थसं-२०१८/२०१८-१९/(प्र.क्र.२३)/प्रशा-१, दि.०६/०४/२०१८.
५) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उ.सं. मैत्री कक्ष / भाडे-२०१८/अे-१३९६, दि. १६/०७/२०१८

प्रस्तावना:-

राज्याच्या औद्योगिक धोरणानुसार राज्य शासनाने दि. २७/०२/२०१४ पासून राज्यात गुंतवणूक करण्यास इच्छुक असलेल्या गुंतवणूकदारांना सहाय्य करण्यासाठी "एकात्मिक सुलभता कक्ष" Integrated Facilitation Centre "महाराष्ट्र उद्योग व्यापार आणि गुंतवणूक सुविधा केंद्र" मैत्री कक्ष मुंबई येथे स्थापित करण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर कक्ष महाराष्ट्र राज्य लघुउद्योग विकास महामंडळ (MSSIDC), कृपानिधी, ९, वालचंद हिराचंद मार्ग, बॅलाड इस्टेट, मुंबई-०१, येथे दि. २७/०८/२०१३ पासून आजतागायत कार्यान्वित आहे. सदर कक्षाची जागा महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ (MSSIDC) यांचेकडून भाडेतत्त्वावर घेण्यात आली आहे. सदर भाडयापोटी महामंडळास (MSSIDC) दिनांक ०१/०४/२०१७ पासून ३१/०३/२०१८ पर्यंत(०१ वर्ष ) सेवाकरांसहित एकूण भाडे रक्कम **रु.६६,५१,७८०/-(अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष एक्कावन्न हजार सातशे ऐंशी फक्त)** अदा करण्यास मंजूरी देण्याची विनंती उद्योग संचालनालयाने उपरोक्त संदर्भांकित क्र. ५ येथील पत्रान्वये केली आहे. सदर रक्कम उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

“मैत्री” कक्षासाठी महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळाकडून (MSSIDC) भाडेतत्त्वावर घेतलेल्या जागेच्या भाडयापोटी दिनांक ०१/०४/२०१७ पासून ३१/०३/२०१८ पर्यंत (०१वर्ष)सेवाकरांसहित एकूण भाडे रक्कम **रु.६६,५१,७८०/-(अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष एक्कावन्न हजार सातशे ऐंशी फक्त)** सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून अदा करण्यास शासन कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर भाडयापोटी होणारा खर्च "मागणी क्र. के-७, मुख्य लेखाशीर्ष-२८५२, उद्योग, ८०, सर्वसाधारण, १०२ औद्योगिक उत्पादकता, (००) (१५) "मैत्री" कक्षाकरिता खर्च (योजनांतर्गत) (२८५२ ए ०२२ ) या लेखाशीर्षाखालील भाडेपट्टी व कर (१४) या उपलेखाशिर्षाखाली उपलब्ध करण्यात आलेल्या तरतुदीमधून रु.५० लक्ष व इतर सेवा-५० अंतर्गत उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून रु.१६,५१,७८०/-अशी एकूण **रु.६६,५१,७८०/- (अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष एक्कावन्न हजार सातशे ऐंशी फक्त)** सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३ हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२१३ विनियम, भाग-२ दिनांक १७/४/२०१५ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग १ मधील अनुक्रमांक -१० नियम क्र. ११५ अनुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०९२७१७४५२५६८१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,**

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IELD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2018.10.05 15:32:48 +05'30'

**(श्रध्दा कोचरेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य लघु उद्योग विकास महामंडळ, (MSSIDC), कृपानिधी ९, वालचंद हिराचंद मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई - ४०० ००१.
३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
४) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
५) सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७ / अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई-३२.
९) कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवड नस्ती ( उद्योग-८).